श्री ज्ञानदेवांची गणेशवंदना

ओम नमोजी आद्या! वेदप्रतिपाद्या!
जय जय स्वसंवेद्या! आत्मरुपा!
देवा तुची गणेशु! सकलार्थमती प्रकाशु!
म्हणे निवृतीदासू! अवधारिजो जी!

वेद वेदान्तांनी ओंकार रूप आद्यतत्व परब्रह्म परमात्मरुपात ज्या स्वसंवेद्य आत्मतत्वाचे वर्णन केले ते परब्रह्म तत्वच श्री गणेश रुपात उपास्य आहे ते आत्मचैतन्यच सगळ्यांच्या बुद्धीला अर्थ दाखविणारे बुद्धीपती तत्व आहे. हे निवृत्तीदास प. पु. माऊली अवधारण करायला सांगत आहेत.

" अवधारिजो जी " ही शब्दरचना मोठी गोड आहे. संस्कृतची उपसर्ग लावून धातूच्या अर्थाला अलंकृत करण्याची रीती माऊली मराठीत वापरते. अवधारण करणे म्हणजे दृढरीत्या धारण करणे, पक्के ध्यानी घेणे, नीट समजून घेणे, मनी बसविणे काय? तर हे ओंकाररूप परब्रह्मच श्रीगणेश आहे. श्रीगणेशांचे हेच वास्तवरूप आहे. स्वरूप आहे. "देवा तूची गणेशु" ही माऊलींची परमशास्त्रीय स्पष्टोक्ती आहे. त्या ब्रह्मणस्पतींचे सगळ्या संतांनी ग्रंथारंभी आरंभवंदन केले आहे.

आपल्या डोक्यातील शिवपुत्र ही कल्पना ज्ञानदेवांना कुठेच मान्य नाही. उलट भगवान श्रीशंकरांना श्रीगणेश वंदन करताना दाखवून मोरयाच्या परब्रह्मत्वालाच त्यांनी अधोरेखित केले.
माऊलीचेच शब्द सांगायचे तर त्रिगुण त्रिपुरी वेढिला! जीवत्वदुर्गी आडिला तो आत्मा शंभूने सोडविला! तुझिया स्मृती! १७/२ त्रिपुरासुर वध ही भगवान श्री शंकरांची सर्वात महत्वपूर्ण लीला. त्यावेळी श्रीशंकर श्रीगणेशाराधान करतात हे प्रत्यक्ष शिवपुराणातच वर्णन केले आहे. त्याच श्री आदिनाथांपासून आरंभ झालेल्या परंपरेचे वहन करणारी माऊली त्याच परमसत्य भूमिकेला अधोरेखित करते.
प.पु. माऊली त्या कथानकाचा आधार तर घेतेच पण केवळ कथे पुरता विचार न करता त्यातील अध्यात्मिक गुढार्थही उलगडून दाखविला आहे. त्रिपुरासूर कोण? तर जीवच तो त्रिगुण रुपी तीन पुरात अडकतो. तीन देह हेच त्याचे त्रिपुर असतात. त्यातून सोडवणार ते भगवान श्रीशिव शिव शब्दाचा अर्थच आहे पवित्र. शंकर शब्दाचा अर्थच आहे कल्याणकरणारा वेगळ्या शब्दात श्रीशिव म्हणजेच ज्ञान.

त्रीगुणरुपातील त्रिपुरात अडकलेल्या जीवाची मुक्ती केवळ आणि केवळ ज्ञानानेच संभव आहे. ते ज्ञान ज्या परमचैतन्याच्या अधिष्ठानावर प्रगटते ते आहे श्रीगणराज प्रभू. म्हणूनच माऊली शब्दरचना करते.

तो आत्मा शंभूने सोडविला! तुझिया स्मृती श्रीशिव आपली सर्वोच्च लीला श्रीगणेश स्मरण पूर्वक करतात. अन्य सकल देवतांमध्ये सर्वोच्च आहेत श्री शंकर. म्हणूनच तर बाकी देव आहेत आणि हे महादेव आहेत. ते महादेव आपली महानलीला "श्रीगणेश स्मृतीने युक्त होऊन करतात" या विधानाचा व्यापक अर्थ हाच आहे की अन्य सकल देवतांच्या सकल लीलांच्या अधिष्ठान रुपात असणारे शुध्द चैतन्य आहेत "भगवान श्रीगणेश".

श्रीशंकर आपल्या कार्यापूर्वी श्रीगणेश वंदन करतात ती केवळ लोकरूढी आहे एवढाच भाग नाही. आपणच दिलेल्या आशीर्वादाचा तो मान ठेवलाय असेही नाही. तर माउलींच्या मते श्रीगणेशच सर्वोच्च आहेत. अतुलनीय आहेत. ते अत्यंत सुस्पष्ट शब्दात लिहितात की -
म्हणोनी शिवेसि कांटाळा गुरुत्वे तूंची आगळा! १७/३ अर्थात श्रीशंकरांसोबत जर मोरयाचा कांटाळा अर्थात तुलना केली तर गुरुत्वे अर्थात मोठे पणाने तूच आगळा म्हणजे वैशिष्टपूर्ण ठरशील.
आणखी किती स्पष्ट सांगायचे? श्रीशंकर आणि श्रीगणराजांची तुलना करता श्रीगणेश हेच श्रेष्ठ ठरतात. ही एक ओवी मोरयाचे वैभव सांगण्यास पुरेशी आहे.

प.पु. माऊलींच्या लेखी मोरयाचे हेच वास्तवरूप आहे. ते सांगताना ते एक खंत ही मांडतात कोणती खंत? तर सामान्य जनांना हे गणराजाचे मुळरूप कळतच नाही. हे यथार्थ रूप न जाणून घेता ते गतानुगतिक रीत्या श्रीगणेशांना शिवपुत्र, पार्वती नंदन, शिवगण प्रमुख इतकेच समजतात. अशा अशास्त्रीय धारणा युक्तांना माऊली थेट "मूढ" म्हणतात.

जे तुझ्याविखी मूढ
तया लागी तू वक्रतुंड
ज्ञानियासी तरी अखंड
उजुची आहासी! १७/४ प.पु. माऊली म्हणत आहे की जे मूढ लोक मोरयाच्या या वास्तवरुपाला जाणत नाहीत त्यांचासाठी मोरया वक्रतुंड आहे.

तुंड म्हणजे तोंड. मुख. आपले मुख ही आपली ओळख असते. मोरया वक्रतुंड आहे म्हणजे काय तर त्यांची ओळखच सामान्यांना होत नाही. ते चुकीच्या, अयोग्य, वक्र रूपातच मोरयाला ओळखतात. शिवपुत्र आदी मानतात म्हणून इतरांसाठी श्रीगणेश वक्रतुंड आहेत. मात्र ज्ञानवतांसाठी ते कायम सरळच आहेत. कसे आहे ते सरळ रूप. तर ओंकार रूप.

ओंकार = परब्रह्म = श्रीगणेश हेच वास्तव आहे.

अशा परब्रह्म गणराजांचे आरंभवंदन करतात श्रीज्ञाननाथ. कसे? पुढच्या चतुर्थीला पाहू.
जय गजानन!